**सन २०१४-१५ या वर्षातील रुपांतरीत कर्जावरील सन २०१५-१६ या वर्षाचे संपुर्ण व्याज व पुढील चार वर्षाचे ६ टक्के दराने व्याज अदा करण्याच्या अनुषंगाने निधी वितरीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.अर्थसं०३२४/प्र.क्र.९८/१८-स**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० मार्च २०२४

**<u>संदर्भ</u>** :- (१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.बैठक ०४१५/प्र.क्र.१२६/२-स. दि. २९.०७.२०१५

(२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. बैठक ०२२३/प्र.क्र.३७ /१८-स, दि १२.०१.२०२४.

(३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४० /अर्थ-३,दि.०५.०२.२०२४

(४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचे पत्र क्र.कृषीपत-०२/रुपांतरीत कर्जावरील व्याजमाफी/पूरक मागणी/२०२४/८०२. दि.१५.०३.२०२४

५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. पुनर्वि-२३२४/प्र.क्र.२५/२०२४/१७-स दि.३०.०३.२०२४

**<u>प्रस्तावना</u> -:**

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात नैसर्गिक आपत्तीने बाधित झालेल्या जिल्हयातील शेतकऱ्यांनी घेतलेल्या अल्पमुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतर करुन जे शेतकरी या रुपांतरीत कर्जाचा प्रत्येक वार्षिक हप्ता बँकेस विहीत मुदतीत परत करतील अशा शेतकऱ्यांच्या कर्जावरील सन २०१५-१६ या वर्षाचे संपूर्ण व्याज व त्यापुढील चार वर्षाचे ६% दराने होणारे व्याज शासनामार्फत अदा करण्यास संदर्भ क्र. १ मधील दि.२९.०७.२०१५ च्या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात आली आहे. तथापि, रुपांतरीत कर्जाचा वार्षिक हप्ता विहीत मुदतीत परत करण्याची व हे शेतकरी नैसर्गिक आपत्तीने बाधित असण्याची अट शिथील करुन शेतकऱ्यांना देय असलेले व्याज रुपांतरीत कर्जावरील व्याजमाफी (२४२५ २५०६) या योजनेंतर्गत अदा करण्यास विशेष बाब म्हणून संदर्भ क्र. २ मधील दि. १२.०१.२०२४ च्या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने रत्नागिरी जिल्हयातील सन २०१४-१५ या वर्षातील पीक कर्जाचे पुनर्गठन झालेल्या शेतकऱ्यांना व्याज अदा करण्यासाठी रु. ४९८.८५ लाख एवढा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव सहकार आयुक्त व निबंधक कार्यालयाने शासनास सादर केला आहे. तथापि, उपरोक्त लेखाशिर्षाखाली (२४२५ २५०६) सध्या निधी उपलब्ध नसल्याकारणाने, संदर्भ क्र. ५ मधील दि. २९.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना, २०१७ (२४३५ ००८२) साठी उपलब्ध असलेल्या निधीतून रू. ४९८.८५ लाख इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करण्यात आलेला रु. ४९८.८५ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना, २०१७ लेखाशिर्ष (२४३५ ००८२), ३३- अर्थसहाय्य या अंतर्गत उपलब्ध असलेल्या निधीतून पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करण्यात आलेला रु. ४९८.८५ लाख इतका निधी रत्नागिरी जिल्हयातील सन २०१४-१५ या वर्षातील पिक कर्जाचे पुनर्गठन झालेल्या शेतकऱ्यांचे सन २०१५-१६ या वर्षाचे संपूर्ण व्याज व पुढील चार वर्षाचे ६% दराने होणारे व्याज अदा करण्यासाठी रुपांतरीत कर्जावरील व्याजमाफी (कार्यक्रम) (२४२५ २५०६) ३३, अर्थसहाय्य या लेखाशिर्षांतर्गत वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद खर्च करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन वेळेत खर्च होईल याची दक्षता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास सादर करावी.

३. सदर रक्कम मागणी क्रमांक व्ही-०२, २४२५-सहकार १०७, सहकारी पतसंस्थांना सहाय्य, (०१) सहकारी पतसंस्थांना सहाय्य (०१) (१५) रुपांतरीत कर्जावरील व्याजमाफी (कार्यक्रम), (२४२५ २५०६) ३३, अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखालील पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१८/का.१४३१, दिनांक २२. ०३.२०२४ अन्वये व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २९५ /२०२४/व्यय-२, दिनांक २६.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३३०१६३९२५८४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb17644257503716 0fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2024.03.30 16:49:28 +05'30'

**( संतोष पाटील )**
**अपर निबंधक तथा सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-२, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
५) निवासी व लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).

७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).

८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).

९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती (कार्यासन २-स).